जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गाची दिनांक ०१.०१.२००१ ते दिनांक ०१.०१.२०२० या कालावधीची सुधारित तात्पुरती ज्येष्ठता यादी.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः एसएलएस २०२२/प्र.क्र. १३६/२०२२/आ.(वर्ग-१)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक : ३१ जुलै, २०२३.

वाचा:-

१) शासन निर्णय,पाटबंधारे आणि वीज विभाग, क्रमांक- जीएबी-१०७०-ई(एक), दिनांक १९.१२.१९७०.
२) शासन निर्णय, पाटबंधारे आणि वीज विभाग, क्रमांक- जीएबी १०७०-नऊ-ई(एक), दिनांक २०.०१.१९७२.
३) शासन अधिसूचना, पाटबंधारे विभाग, क्रमांक- एसटीवाय ११८१/(११०)/भाग-३/ई-२, दिनांक ०७.०४.१९८३.
४) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक- सीडीएस १५८२/१५८(२१५)/आ(१०), दिनांक १६.०४.१९८४.
५) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक- वेपुर १०९२/(६२९/९२)/आ (क्षेप्र), दिनांक १४.१२.१९९५.
६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- एसआरव्ही-१०९४/प्र.क्र.४/९४/बारा, दिनांक ०७.०३.१९९६.
७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- बीसीसी २००१/१८८७/प्र.क्र.६४/०१/१६-ब, दिनांक २५.०५.२००४.
८) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये-१२०७/(१२/०७)/आ.(ज्येष्ठता), दिनांक २८.०९.२००७.
९) शासन परिपत्रक,जलसंपदा विभाग, क्रमांक- एसटीजी-२००९/(०८/२००९)/ आ.(ज्येष्ठता), दिनांक २३.०९.२०१०.
१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८४/२०१२, दिनांक २१.१०.२०११.
११) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११२/(१००/२०१२)/आ(वर्ग-१), दिनांक २६.०४.२०१२.
१२) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११२/(१००/२०१२)/आ(वर्ग-१), दिनांक १८.०५.२०१२.
१३) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११३/(१२२/२०१३)/आ(वर्ग-१), दिनांक ०३.०४.२०१३.
१४) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११२/(१००/२०१२)/आ(वर्ग-१), दिनांक ०७.०५.२०१३.
१५) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११४/(१५८/२०१४)/आ(वर्ग-१), दिनांक २८.०४.२०१४.

**१६)** शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११४/(१५८/२०१४)/आ(वर्ग-१), दिनांक ३०.०८.२०१४.

**१७)** शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११५/(४९९/२०१५)/आ(वर्ग-१), दिनांक २५.०५.२०१६.

**१८)** शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११५/(२५८/२०१५)/आ(वर्ग-१), दिनांक १७.११.२०१६.

**१९)** शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११७/(१५५/२०१७)/आ(वर्ग-१), दिनांक २३.०८.२०१७.

**२०)** शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- बीसीसी २०१७/प्र.क्र. ३१२ए/१६ब, दिनांक २९.१२.२०१७.

**२१)** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- एसआरव्ही २०१८/प्र.क्र. १५९/कार्यासन १२, दिनांक ०१.०८.२०१९.

**२२)** शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये १११८/(३३९/२०१८)/आ(वर्ग-१), दिनांक ०९.१२.२०१९.

**२३)** शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- काअज्ये ११२०/(६०/२०२०)/आ(वर्ग-१), दिनांक २२.१२.२०२०.

**<u>शासन परिपत्रक</u> :-**

कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गात तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेल्या अभियंत्यांची पदोन्नती नियमित करण्याच्या अनुषंगाने सन २००१-२००२ ते सन २०१८-२०१९ (दिनांक ०१.०४.२००१-३१.०३.२००२ ते दिनांक ०१.०४.२०१८-३१.०३.२०१९) या कालावधीतील निवडसूचींचे सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पुनर्विलोकन व समायोजन करुन नियमित पदोन्नतीच्या ज्येष्ठतेचा दिनांक दर्शवून दिनांक ०१.०१.२००१ ते दिनांक ०१.०१.२०२० या रोजीची वर्षनिहाय स्थिती दर्शविणारी सुधारित तात्पुरती ज्येष्ठता सूची प्रसिध्द करण्यात येत आहे.

२. शासन अधिसूचना, पाटबंधारे विभाग, दिनांक ०७.०४.१९८३ अन्वये "महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, वर्ग-१ आणि महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, वर्ग-२ मधील कार्यकारी अभियंता आणि सहायक अभियंता (ज्येष्ठतेचे नियमन आणि ज्येष्ठता यादी तयार करणे आणि ज्येष्ठता यादी सुधारित करणे) नियम, १९८३" प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर नियमामध्ये कार्यकारी अभियंता संवर्गामधील पदोन्नती व सेवाज्येष्ठता या बाबींशी संबंधित प्रामुख्याने नियम ४(१), ४(२), ५(२), ५(२)(ए), ६(१) व ६(२) मध्ये पुढीलप्रमाणे तरतूदी नमूद केल्या आहेत :-

४(१) दरवर्षीची संवर्ग संख्या निश्चित करण्यात येऊन उपलब्ध होणारी रिक्त पदे अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व वर्ग-२ यांच्या पदोन्नतीकरीता विचारात घ्यावी.

४(२) कार्यकारी अभियंता (स्था.) या संवर्गात संबंधीत निवडसूची वर्षामध्ये उपलब्ध होणारी रिक्त पदे भरताना प्रथम ४० टक्के पदे ज्या सहायक कार्यकारी अभियंता, वर्ग-१ यांची ४ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेली आहे, अशा अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने ही पदे भरण्यात यावीत व उर्वरित ६० टक्के पदे ज्या उप अभियंत्यांची

नियमित सेवा ७ वर्ष पूर्ण झालेली आहे किंवा त्यांची सेवा अभावित स्वरुपाची नाही, अशा उप अभियंत्यांच्या पदोन्नतीने भरण्यात यावीत. तसेच, उप अभियंता संवर्गातील (Frozen Cadre) अधिकारी उपलब्ध नसल्यास ६० टक्के कोट्याची पदे सहायक अभियंता श्रेणी-१, उप विभागीय अभियंता व उप विभागीय अधिकारी या संवर्गातून २५:२५:१० या कोटा तत्वानुसार भरण्यात यावीत.

५(२) प्रत्येक वर्षाच्या १ तारखेला किंवा त्यापूर्वी ज्यांची तदर्थ पदोन्नती नसेल अशा अधिकाऱ्यांपैकी सेवानिवृत्त व पदोन्नत अधिकारी वगळून उर्वरित अधिकाऱ्यांची संवर्गातील नियमित सेवेचा कालावधी गृहीत धरुन दरवर्षी कार्यकारी अभियंत्यांची ज्येष्ठता यादी प्रसिध्द करावी.

५(२)(ए) अधिकाऱ्यास कार्यकारी अभियंता पदावर तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती दिलेला कालावधी हा कार्यकारी अभियंता पदावरील नियमित सेवेच्या कालावधीचा भाग समजला जाणार नाही.

६(१) कार्यकारी अभियंत्यांची रिक्त पदे सहायक अभियंता वर्ग-१ आणि महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२ करीता वाटप केल्याप्रमाणे नियम ४ मधील तरतुदीनुसार त्यांच्या अंतर्गत ज्येष्ठतेच्या क्रमानुसार भरण्यात यावीत.

६(२) कार्यकारी अभियंता पदावरील रिक्त पदावर एखाद्या अधिकाऱ्यास नियुक्तीचा प्रत्यक्ष दिनांक, ज्या संवर्गासाठी तो संबंधित आहे, त्या संवर्गातील त्याच्या ज्येष्ठतेच्या क्रमानुसार नसल्यास, त्याला नियम ६(१) मधील तरतुदीनुसार ज्या पदावर तो नियुक्त होण्यास पात्र आहे तो नियुक्तीचा मानीव दिनांक निश्चित केला जाईल.

३. शासन निर्णय, पाटबंधारे व वीज विभाग, दिनांक १९.१२.१९७० अन्वये कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील पदोन्नतीबाबत महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग एक आणि वर्ग दोन यामधील नियुक्ती संबंधी कार्यपद्धती व नियम विहीत करण्यात आले आहेत. या नियमातील, स्थायीकरण झालेले व स्थायीकरण न झालेले असे ज्येष्ठता सूचीचे दोन भाग करण्याबाबतचा नियम ३३ दिनांक ०७.०४.१९८३ च्या अधिसूचनेन्वये वगळण्यात आला आहे. सन २००१-०२ ते २०१८-१९ या कालावधीच्या कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या निवडसूचींचे पुनर्विलोकन करताना, कार्यकारी अभियंता संवर्गामधील सहायक अभियंता श्रेणी-१, उप विभागीय अभियंता आणि उप विभागीय अधिकारी या तीनही संवर्गांच्या पदोन्नतीच्या कोट्यामध्ये उपलब्ध झालेली पदे विचारात घेऊन, सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार पदोन्नतीचे निकष तपासून तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांची पदोन्नती नियमित केलेली आहे. यानुषंगाने सेवाप्रवेश नियमातील पुढील तरतुदी प्रामुख्याने विचारात घेण्यात आल्या आहेत :-

(पाच)(२४) कार्यकारी अभियंत्यांची सर्व पदे वर्ग-एक मधील सहाय्यक अभियंता वर्ग-एक मधील थेट सेवा प्रविष्ट आणि वर्ग-दोन मधील उप अभियंते, सहाय्यक अभियंते वर्ग-दोन, उप विभागीय अभियंतो व उप विभागीय अधिकारी या चार संवर्गातील अधिकारी यांच्यामधून अनुक्रमे ४० टक्के आणि ६० टक्के याप्रमाणे भरण्यात येतील.

(पाच)(२५) व (२७) कार्यकारी अभियंत्यांच्या ६० टक्के पदे, वर्ग-२ मधील थेट सेवा प्रविष्टांमधून बढती देऊन २५ टक्के, वर्ग-दोन मधील स्नातक पदोन्नतांमधून बढती देऊन २५ टक्के आणि वर्ग-दोन मधील स्नातकेतर पदोन्नतांमधून स्थानापन्न बढती देऊन १० टक्के या प्रमाणात बढती देऊन भरण्यात येतील. स्थानापन्न

बढत्या देताना देखिल शक्यतोवर ही प्रमाणे पाळली जातील. कार्यकारी अभियंत्यांच्या संपूर्ण संवर्गातील एकूण पदसंख्येच्या संदर्भात विविध प्रवर्गासाठी निश्चित केलेल्या एकूण प्रमाणानुसार भरण्यात येतील.

(पाच)(२८) स्थानापन्न कार्यकारी अभियंता म्हणून पदोन्नती मिळण्यास पात्र ठरण्यासाठी खाली दर्शविल्याप्रमाणे किमान सेवा पूर्ण करणे आवश्यक असेल :-

(एक) सहायक अभियंत वर्ग-एक- ४ वर्षे

(दोन) उप अभियंते, सहायक अभियंते वर्ग- दोन आणि उप विभागीय अभियंते- वर्ग दोन मधील सेवा ७ वर्षे

(तीन) उप विभागीय अधिकारी- वर्ग २ मधील सेवा १० वर्षे.

३७(अ) स्थायी कार्यकारी अभियंत्यांच्या यादीमध्ये एखाद्या विशिष्ट वर्षात कायम करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांची नावे खालीलप्रमाणे लावण्याबाबतची तरतूद करण्यात आलेली आहे :-

(एक) सहायक अभियंता वर्ग- एक मधील पदोन्नत व्यक्ती एकत्रितपणे.

(दोन) उप अभियंता मधील पदोन्नत व्यक्ती एकत्रितपणे.

(तीन) सहायक अभियंता वर्ग- दोन मधील पदोन्नत व्यक्ती एकत्रितपणे.

(चार) उप विभागीय अभियंत्यांमधील पदोन्नत व्यक्ती एकत्रितपणे.

(पाच) उप विभागीय अधिका-यांमधील पदोन्नत व्यक्ती एकत्रितपणे.

४. शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, दिनांक १६.०४.१९८४ अन्वये, पदवीधर व अन्य कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित दर्जा देताना सहायक अभियंता (वर्ग १) आणि सहायक अभियंता (वर्ग २) या संवर्गाच्या पदनामात अनुक्रमे सहायक कार्यकारी अभियंता आणि सहायक अभियंता श्रेणी-१ असा बदल करण्यात आलेला आहे.

५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०१.०८.२०१९ अन्वये राज्य शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्यासंदर्भात मार्गदर्शक तत्वे विहीत करण्यात आली आहेत. सदर मार्गदर्शक तत्वांमधील परिच्छेद- ई(१)(१.९) मध्ये, तदर्थ पदोन्नत्या या ज्यावेळी पदोन्नती कोट्यातील प्रत्यक्षात रिक्त झालेल्या पदांवर आरक्षण व ज्येष्ठतेनुसार नियमित करण्यात येतील त्यावेळी तदर्थ पदोन्नती नियमित झाले असे समजण्यात येईल, अशी व्याख्या नमूद केली आहे.

६. कार्यकारी अभियंत्यांच्या पदोन्नती व सेवाज्येष्ठतेबाबत जलसंपदा विभागाने विहित केलेले दिनांक १९.१२.१९७० चे सेवाप्रवेश नियम आणि दिनांक ०७.०४.१९८३ चे सेवाज्येष्ठतेचे नियम एकमेकांशी पूरक आहेत. सदर नियम आणि सामान्य प्रशासन विभागामार्फत पदोन्नती संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या नियमातील तरतुदीनुसार सेवाज्येष्ठता आणि ज्येष्ठतेचा दिनांक निश्चित करुन प्रस्तुत ज्येष्ठता सूची प्रसिध्द करण्यात येत आहे.

७. कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या दिनांक २१.१२.१९७० ते ३१.०३.१९९३ या कालावधी पर्यंतच्या सेवाज्येष्ठता याद्या दिनांक ०४.०६.१९९२, २४.०१.१९९४ व ०५.०५.१९९४ च्या परिपत्रकांन्वये प्रसिध्द करण्यात आल्या होत्या. सदर सेवाज्येष्ठता याद्या तयार करतांना महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व वर्ग-२ संवर्गाच्या

दिनांक ०७.०४.१९८३ च्या ज्येष्ठता विनियमातील तरतुदीचे विशेषत: सहायक कार्यकारी अभियंता व उप अभियंता यांची पदे भरताना ४०:६० या कोट्याचे पालन न झाल्याबाबत मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपिठ मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक- १०७/१९९९ व १४६/१९९९ मध्ये मा.न्यायाधिकरणाने दिनांक २७.०४.२००० अन्वये खालीलप्रमाणे निर्णय दिलेला आहे:-

"१) Determine cadre strength for each year as required under rule ४(१) and cadre strength should include all posts permanent and temporary (excluding the years for which it is already fixed and published).

२) From १९७० to १९७४, promotions to the post of Executive Engineers shall be in accordance with rule ४(२).

३) In १९७४, the Government decided policy of reservation. Roster points in the cadre of Executive Engineers should be determined. As far as possible, promotions to roster points shall also follow rule ४(२), but if backward class officers are not available in Assistant Executive Engineer Class I and Frozen Deputy Engineers in vacancies meant for that cadre, backward class officers from other cadres may be promoted. Backward class officers promoted in such posts according to roster point shall count seniority on the basis of continuous service from the date of appointment. Their appointment will not be fortuitous.

४) The respondents are competent to make promotion from other cadres as stop-gap arrangement in vacancies of Executive Engineers meant for the cadre of Assistant Executive Engineer Class-I, if officers with prescribed qualification i.e. experience of four years are not available. However, their appointments will be fortuitous till regular appointment in vacancy meant for their cadre and such fortuitous period shall be excluded for the purpose of seniority"

८. मा.न्यायाधिकरणाने वरीलप्रमाणे दिनांक २७.०४.२००० अन्वये दिलेल्या आदेशाविरुध्द शासनाने मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या रिट पिटीशन क्रमांक- १७९७/२००१ मध्ये दिनांक २७.०१.२००५ रोजीच्या आदेशान्वये, **मा.न्यायाधिकरणाच्या दिनांक २७.०४.२००० रोजी आदेशित केलेली विहित ज्येष्ठता निश्चितीबाबतची मार्गदर्शक तत्वे, सदर आदेशातील परिच्छेद-२२ मधील अ.क्र. ३ वगळून ग्राह्य ठरविली आहेत.**

९. उपरोक्त सर्व बाबी विचारात घेऊन, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या निवडसूच्यांच्या पुनर्विलोकन व पुन:समायोजनाची कार्यवाही पूर्ण करुन दिनांक २१.१२.१९७० ते ३१.०३.१९९३ या कालावधीची अंतिम ज्येष्ठतायादी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने दिनांक २८.०९.२००७ अन्वये प्रसिद्ध करण्यात आली आहे. तसेच दिनांक ०१.०४.१९९३ ते ३१.१२.२००० या कालावधीतील निवडसूच्यांचे पुनर्विलोकन व पुन:समायोजनाची कार्यवाही पूर्ण करुन सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने दिनांक ०१.०४.१९९३ ते दि.३१.१२.२००० या कालावधीची अंतिम ज्येष्ठतायादी दिनांक ०७.०५.२०१३ च्या परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आली आहे.

१०. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १४.१२.१९९५ नुसार कार्यकारी अभियंता हे दुसऱ्या टप्प्याचे पद असल्यामुळे सदर पदास आरक्षण लागू होत नाही. सन १९७० ते १९९२ पर्यंतच्या निवडसूचींचे

पुनर्विलोकन करत असताना, मूळ निवडसूच्या आरक्षणासह करण्यात आलेल्या असल्याने व दिनांक १४.१२.१९९५ च्या शासन निर्णयानुसार पूर्वलक्षी प्रभावाने कार्यकारी अभियंता हे दुसऱ्या टप्प्याचे पद ठरत असल्यामुळे, सन १९७० ते १९९४ यापैकी सन १९८६ पासूनच्या पुढील निवडसूचींचे नव्याने आरक्षण विरहीत पुनर्विलोकन केले तर आरक्षीत प्रवर्गातील अभियंत्यांच्या सेवाज्येष्ठतेवर खूप मोठ्या प्रमाणात प्रतिकूल परिणाम होईल, ही बाब विचारात घेऊन सन १९८६ ते १९९४ पर्यंतच्या आरक्षणासह तयार करण्यात आलेल्या सुधारित निवडसूचींमध्ये बदल न करण्याचा आणि त्यापुढील सुधारित निवडसूच्या आरक्षण विरहित करण्याचा जाणीवपूर्वक निर्णय त्यावेळी सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने घेण्यात आला आहे. त्यानुसार सन १९९७, १९९८ व २००० च्या सुधारित निवडसूचीमध्ये उप अभियंता संवर्गातील अधिकाऱ्यांना पदोन्नती देतेवेळी उपलब्ध झालेल्या दिनांकनिहाय पदावर २५:२५:१० या विहीत प्रमाणात नियमित पदोन्नत्या दर्शविण्यात आल्या आहेत. तथापि, प्रत्यक्षात कोट्याच्या मर्यादेत राहून तदर्थ पदोन्नती नियमित केलेल्या आहेत.

११. सन २००१-०२ ते २०१८-१९ या कालावधीच्या निवडसूचींच्या अनुषंगाने महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ मधील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाची दिनांक ०१.०४.२००० ते ०१.०९.२०२० या कालावधीची संवर्गसंख्या निश्चित करण्यात आली असून, तद्नंतर संवर्गसंख्या कायम आहे. दिनांक ०१.०४.२००१ ते ०१.०९.२०२० या कालावधीतील संख्येचा तपशील **परिशिष्ट-१** मध्ये दर्शविण्यात आला आहे.

१२. कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील दिनांक ०१.०४.२००१ ते ३१.०३.२०१९ या कालावधीतील निवडसूच्यांचे पुनर्विलोकन व पुन:समायोजनाची कार्यवाही पूर्ण करुन त्यानुसार कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील मंजूर पदे, सहायक कार्यकारी अभियंता व उप अभियंता (उप अभियंता, सहायक अभियंता श्रेणी-१, उप विभागीय अभियंता आणि उप विभागीय अधिकारी) संवर्गातील प्रत्यक्ष कार्यरत पदे, रिक्त पदे (प्रत्यक्ष रिक्त + संभाव्य रिक्त) व रिक्त पदांच्या प्रमाणानुसार नियमित पदोन्नतीसाठी उपलब्ध झालेली पदे आणि कार्यकारी अभियंता पदावर नियमित केलेली पदे याबाबतचा वर्षनिहाय व संवर्गनिहाय तपशील **परिशिष्ट-२** मध्ये दर्शविला आहे.

१३. परिशिष्ट-२ मधील तपशिलामध्ये, दिनांक ०७.०४.१९८३ च्या ज्येष्ठतेच्या विनियमनातील नियम ४(२) नुसार कार्यकारी अभियंता संवर्गाच्या निम्न संवर्गासाठी विहीत केलेल्या कोट्यानुसार निवडसूची वर्षनिहाय उपलब्ध झालेली प्रत्यक्ष रिक्त पदे आणि सहायक कार्यकारी अभियंता व उप अभियंता या मूळ संवर्गासाठी रिक्त पदांच्या ४०:६० या प्रमाणात नियमित पदोन्नतीसाठी उपलब्ध झालेली पदे याची परिगणना करण्यात आली आहे. कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर निम्न संवर्गातून पदोन्नती देतेवेळी सहायक कार्यकारी अभियंता या संवर्गास ४० टक्के कोटा सेवाप्रवेश नियमानुसार अनुज्ञेय आहे. त्यानुसार सुधारित निवडसूची करताना सहायक कार्यकारी अभियंता यांच्या वाट्याची पदे नियम ४(२) मधील तरतुदीनुसार रिक्त ठेवण्यात आलेली आहेत. त्याचप्रमाणे ते नियुक्तीच्या दिनांकानुसार ४ वर्षानंतर पदोन्नतीस पात्र ठरत असल्याने त्या दिनांकास त्यांना सन २००१-०२ ते २०१८-१९ च्या निवडसूची मध्ये ज्येष्ठतेनुसार स्थान देण्यात आलेले आहे. उर्वरित उप अभियंता या संवर्गाच्या ६० टक्के कोट्यामधून कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावरुन सेवानिवृत्त / पदोन्नत / स्वेच्छासेवानिवृत्त/ राजीनामा/ निधन इत्यादी मुळे रिक्त झालेली पदे दिनांक ०१.०४.२००१ पासून दिनांकनिहाय परिगणित करण्यात आलेली आहेत. त्यानुसार उपलब्ध झालेली पदे विहीत कोट्यातंर्गत असल्यामुळे सन २००१-०२ ते २०१८-१९ च्या प्रस्तावित सुधारित निवडसूचीमध्ये संबंधीत उप अभियंता संवर्गातील अधिकाऱ्यांना पदोन्नती देतेवेळी उपलब्ध झालेली पदे विचारात घेऊन, सदर पदावर २५:२५:१० या विहीत प्रमाणात कोट्याच्या

मर्यादेत राहून नियमित पदोन्नत्या दर्शविण्यात आलेल्या आहेत. प्रत्येक सुधारित निवडसूचीच्या सुरुवातीस रिक्त असलेली पदे विचारात घेऊन तदर्थ अधिकाऱ्यांना नियमित ज्येष्ठतेचा दिनांक दर्शविण्यात आले आहेत. सदर ज्येष्ठतेचे दिनांक हे केवळ ज्येष्ठतेच्या प्रयोजनार्थ नमूद करण्यात येत असल्याने त्यानुषंगिक कोणतेही आर्थिक लाभ संबंधित अधिकाऱ्यांना अनुज्ञेय होणार नाहीत.

१४. शासन निर्णय, दिनांक १४.१२.१९९५ अन्वये उप अभियंता या संवर्गाची वेतनश्रेणी रु.२०००-३२०० ऐवजी रुपये २२००-४००० अशी दिनांक ०१.०१.१९८६ पासून पूर्वलक्षी प्रभावाने सुधारित करण्यात आलेली आहे. यामुळे उप अभियंता (स्थापत्य) हे पद वर्ग-१ च्या पहिल्या टप्प्याचे व कार्यकारी अभियंता हे दुसऱ्या टप्प्याचे पद ठरल्यामुळे सदर पदास मागासवर्गीयास लागू असलेले आरक्षण लागू होत नव्हते. त्यामुळे **दिनांक ०१.०४.२००१ ते २८.०१.२००४ या कालावधीतील निवडसूच्या ह्या आरक्षणविरहित** करण्यात आल्या आहेत.

१५. तथापि, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २५.०५.२००४ च्या शासन निर्णयानुसार दिनांक २९.०१.२००४ चा आरक्षण कायद्यान्वये पदोन्नतीच्या सर्व टप्प्यांवर आरक्षण लागू झाले असल्याने, **दिनांक २९.०१.२००४ पासून पुढील निवडसूच्यांना आरक्षण लावण्यात आलेले आहे.** मात्र, आरक्षण कायदा कलम ५ च्या अनुषंगाने पदोन्नतीतील आरक्षण पदोन्नतीच्या सर्व टप्प्यांवर लागू करण्यात आलेल्या दिनांक २५.०५.२००४ च्या शासन निर्णयास मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी त्यांच्या दिनांक ०७.०२.२००५ च्या आदेशान्वये दिलेल्या स्थगितीमुळे सन २००५ व २००६ मधील निवडसूचीतून आरक्षित पदे न भरता उपलब्ध झालेली पदे सेवाज्येष्ठतेनुसार भरण्यात आलेली आहे. त्यानंतर, मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०९.०३.२००७ च्या आदेशान्वये अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती या प्रवर्गातील पदे भरण्यास परवानगी दिल्याने, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाची पदे उपलब्धतेनुसार भरण्यात आलेली आहेत. वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ड) व वि.मा.प्र. प्रवर्गाची पदे न्यायालयाच्या स्थगितीमुळे सन २००६ च्या निवडसूचीतून भरण्यात आलेली नाहीत. दिनांक २८.०३.२००८ च्या आदेशान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाने वि.जा.भ.ज. ची ११ टक्के व वि.मा.प्र. ची २ टक्के अशी १३ टक्के पदोन्नतीमधील आरक्षणाची पदे भरण्यावर मा.उच्च न्यायालयाची असलेली स्थगिती उठविल्याने, सन २००७ च्या निवडसूची पासून वि.जा.भ.ज. ची पदे सामान्य प्रशासन विभागाने (कार्यासन१६-ब) निश्चित करुन दिलेल्या आरक्षणानुसार भरण्यात आलेली आहेत.

१६. पदोन्नतीचे आरक्षण रद्द करण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या याचिका क्रमांक- २७९७/२०१५ प्रकरणी दिनांक ०४.०८.२०१७ रोजीच्या निर्णयान्वये, दिनांक २५.०५.२००४ चा शासन निर्णय अवैध ठरविल्याने, पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायप्रविष्ठ असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक- २८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अधिन राहून भरण्यात यावीत, अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापुर्वी ते, दिनांक २५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशासूचना सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २९.१२.२०१७ च्या पत्रान्वये निर्गमित केल्या. सदर सूचनांस अनुसरुन सामान्य प्रशासन विभागाच्या (कार्यासन १६ ब) अभिप्रायानुसार सन २०१७-१८ व सन २०१८-१९ या वर्षाच्या सुधारित निवडसूचीमधील पदे भरण्यात आली आहेत.

१७. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, दिनांक ०३.११.२०१६ अन्वये श्री.व.ज्ञा. गोन्नाडे यांना दिनांक २९.०५.१९९१ हा कार्यकारी अभियंता पदाचा मानीव दिनांक देण्यात आला असून, दिनांक १६.११.२०१६ च्या परिपत्रकान्वये त्यांचे नांव ज्येष्ठता यादीमध्ये समाविष्ट करण्यात आले आहे.

१८. श्री.र.प्र. लांडेकर यांना कार्यकारी अभियंता पदाचा दिनांक २१.०९.१९९३ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात आला आहे.

१९. शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, दिनांक २५.०२.२०१४ अन्वये श्री.आर.जे. कांबळे यांच्यासह श्री.जी.एस. शेंद्रे ते श्री.जी.के. हटवार यांना दिनांक ०१.०८.१९९५ हा ज्येष्ठतेचा दिनांक मंजूर करण्यात आला आहे.

२०. शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, दिनांक ०२.०१.२०१६ अन्वये श्री.एस.जी. बागुल, श्री.डी.एम. सोनवलकर व श्री.बी.डी. तोंडे यांना कार्यकारी अभियंता पदावरील सुधारित ज्येष्ठतेचा दिनांक देण्यात आला आहे.

२१. शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, दिनांक ०८.०९.२०१५ अन्वये श्री.महेन्द्र गुलाबराव वानखेडे यांचे स्थान सन २००७ च्या निवडसूचीमध्ये अनुसूचित जमातीच्या प्रवर्गावर श्री.भि.सु. सोनडवले व श्री.एस.पी. चित्रगार यांच्यामध्ये दर्शविण्यात आले आहे.

२२. शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, दिनांक १९.०५.२०१७ अन्वये श्री.रविकुमार गजानन पराते (खुला) यांना निवडसूचीच्या पुनर्विलोकन व पुन:समायोजनाच्या प्रस्तावाच्या अधीन राहून कार्यकारी अभियंता पदाचा दिनांक ११.०४.२००५ हा मानीव दिनांक मंजूर आहे. तथापि, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.१२.२०१९ च्या शासन निर्णयास अनुसरुन श्री.पराते यांच्या सेवा दिनांक १४.१०.२०२० च्या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आल्या आहेत.

२३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २१.१२.२०१९ मधील तरतुदीनुसार श्री.मधुकर मोहनरावजी पराते यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करणे आवश्यक होते. तथापि, सदर शासन निर्णय निर्गमित होण्यापूर्वी श्री.पराते हे अधीक्षक अभियंता पदावरुन दिनांक ३०.६.२०१८ रोजी नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाले असल्याने, मा.सर्वोच्च न्यायालयाच्या सिव्हील अपिल क्रमांक- ८९२८/२०१५ मध्ये दिनांक ०६.०७.२०१७ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन, विधी व न्याय विभाग, सामान्य प्रशासन विभाग आणि वित्त विभागाच्या मान्यतेने, शासन आदेश, दिनांक २७.०५.२०२१ च्या आदेशान्वये श्री.प्रशांत पुरुषोत्तम संत, कार्यकारी अभियंता यांना श्री.मधुकर म. पराते यांचा कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीचा दिनांक ३०.०६.२००८ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात आला असून, दिनांक २१.०६.२०२१ व १४.१२.२०२१ शुध्दीपत्रकान्वये त्यांचे नांव श्री.कि.रा. कानडे व श्री.म.म. पराते यांच्यामध्ये समाविष्ट करण्यात आले आहे.

२४. जलसंपदा विभागाच्या दिनांक १७.११.२०१६ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या दिनांक ०१.०१.२०१६ च्या ज्येष्ठतासूचीमध्ये सहायक कार्यकारी अभियंता संवर्गातील नियमित पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांच्या आदेशाच्या दिनांकापुर्वीचा ज्येष्ठतेचा दिनांक सहायक अभियंता श्रेणी-१, उप विभागीय अभियंता आणि उप विभागीय अधिकारी या निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांना दर्शविण्यात आला आहे. सदर अधिकारी सन २०१४-१५ च्या सुधारित निवडसूचीमधुन नियमित पदोन्नतीसाठी पात्र ठरत असून, ज्येष्ठतेचे विनियमन, १९८३ आणि कार्यकारी अभियंता संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार सहायक कार्यकारी अभियंता

संवर्गातील अधिकाऱ्यांना ज्येष्ठतेमध्ये वरचे स्थान दर्शविण्यात आले असून, तद्नंतर सहायक अभियंता श्रेणी-१, उप विभागीय अभियंता आणि उप विभागीय अधिकारी या निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांना संभाव्य रिक्त होणाऱ्या पदांवर नियमित करण्यात आले आहे. यानुषंगाने, दिनांक १६.१०.२०१८ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या दिनांक ०१.०१.२०१८ च्या तात्पुरत्या ज्येष्ठता सूचीमध्ये सहायक कार्यकारी अभियंता यांच्या अगादेर सहायक अभियंता श्रेणी-१, उप विभागीय अभियंता आणि उप विभागीय अधिकारी या क्रमानुसार सेवाज्येष्ठता न दर्शविता, ज्येष्ठतेच्या दिनांकानुसार अधिकाऱ्यांची सेवाज्येष्ठता दर्शविण्यात आलेली असल्यामुळे, श्री.चंद्रशेखर हिंमतराव पाटोळे, कार्यकारी अभियंता यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई मध्ये मूळ अर्ज क्र. १०२५/२०१९ दाखल केला असून, प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

२५. सन २०१६-१७ च्या सुधारित निवडसूचीमध्ये सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गाच्या कोट्यात नियमित पदोन्नतीसाठी प्रवर्गनिहाय आरक्षणाच्या वि.मा.प्र. प्रवर्गाच्या बिंदूवर श्री.प्रशांत पुरुषोत्तम संत पात्र ठरतात. तथापि, श्री.संत, कार्यकारी अभियंता यांना श्री.मधुकर मोहनरावजी पराते यांचा कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीचा दिनांक ३०.६.२००८ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात आलेला असल्यामुळे सन २०१६-१७ च्या सुधारित निवडसूचीमध्ये वि.मा.प्र. प्रवर्गाच्या रिक्त झालेल्या बिंदूवर श्री.विजय किशनराव कुरुंदकर यांना नियमित करण्यात आले आहे.

२६. मृद व जलसंधारण विभागाकडे सेवा वर्ग करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांची नांवे आदेशाच्या दिनांकापासून ज्येष्ठता सूचीमधून वगळण्यात आली आहेत.

२७. सहायक अभियंता श्रेणी-१ या संवर्गातील अधिकाऱ्यांना, सहायक कार्यकारी अभियंता, उप विभागीय अभियंता व उप विभागीय अधिकारी संवर्गाच्या पदोन्नतीच्या कोट्यात उपलब्ध झालेल्या पदांवर तदर्थ पदोन्नती दिल्यामुळे, त्यांना अनुज्ञेय असलेल्या कोट्यापेक्षा जास्त पदोन्नत्या झाल्या आहेत. या संदर्भात महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपिठ औरंगाबाद येथे दाखल झालेला मूळ अर्ज क्रमांक- ९३८/२००९ मध्ये मा.न्यायाधिकरणाने दि.०७.०४.२०१० रोजी खालीलप्रमाणे आदेश दिलेले आहेत:-

"Restore the balance in the ३ feeder cadres of A.E. १, S.D.E. and S.D.O. by maintaining ratio of २५:२५:१० between these cadres, while filling up the shortfall in the feeder cadre of A.E.E. To illustrate on the basis of status in A.E.१ will enjoy १०४+४९ posts, S.D.E. will enjoy १०४+४९ posts and S.D.O. will enjoy ४२+२० posts in the cadre of Executive Engineer i.e. १५३, १५३ and ६२ respectively, till such time as sufficient officers of A.E.E. are available . This will necessarily involve reversion of those, who have been given excess Ad-hoc promotions from A.E.१ cadre beyond the figure of १५३ mentioned above. The balance should be restored as early as possible and in any case with in a period of ६ months."

मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद यांनी वरीलप्रमाणे दिलेल्या आदेशाविरुध्द सहायक अभियंता श्रेणी-१ या संवर्गातील अधिकाऱ्यांनी रिट पिटीशन क्रमांक- ३९७१/२०१० अन्वये उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे याचिका दाखल केली असता, मा.उच्च न्यायालयाने दिनांक ३०.०४.२०१० रोजी पुढीलप्रमाणे अंतरिम आदेश दिलेले आहेत :-

"In the meantime the respondents may carry out the exercise as directed by the Tribunal in its order impugned in the present petition at para.१३, but effect to the order of the Tribunal should not be given until further orders which would result in reversion of other employees."

मा.उच्च न्यायालयाने वरीलप्रमाणे आदेश दिलेले आहेत. तथापि, प्रशासकीय निकड (Administrative Exigency ) विचारात घेऊन, न्यायालयीन निर्णयाच्या अधीन राहून सन २००९ च्या निवडसूचीमधून सहायक कार्यकारी अभियंता यांच्या विहीत कोटयातील रिक्त पदांवर त्या संवर्गातील उमेदवार उपलब्ध नसल्याने विहीत केलेल्या २५:२५:१० या प्रमाणानुसार अनुक्रमे सहायक अभियंता श्रेणी-१, उपविभागीय अभियंता व उपविभागीय अधिकारी या संवर्गातील अधिकाऱ्यांना तदर्थ पदोन्नत्या देण्यात आलेल्या आहेत. त्यानंतरच्या निवडसूच्यांमधून सहायक अभियंता श्रेणी-१ या संवर्गातील कार्यरत कार्यकारी अभियंता हे विहीत कोटयापेक्षा अतिरिक्त (Excess) झाल्यामुळे, त्यांना तदर्थ पदोन्नत्या देण्यात आलेल्या नाहीत. मात्र, उपविभागीय अभियंता व उपविभागीय अधिकारी या संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक कार्यकारी अभियंता यांच्या विहीत कोटयातील रिक्त पदांवर अनुक्रमे २५:१० या विहीत केलेल्या प्रमाणानुसार तदर्थ पदोन्नत्या देण्यात आल्या. त्यामुळे सद्य:स्थितीत अभावित सेवा असणाऱ्या अधिकाऱ्यांचे प्रमाण सेवाज्येष्ठतेमध्ये अधिक दिसून येत आहे.

२८. कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या सेवाज्येष्ठतेबाबत दाखल करण्यात आलेल्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये यापूर्वी दिलेले निर्णय व सध्या न्यायप्रविष्ठ याचिकांची वस्तुस्थिती पुढीलप्रमाणे आहे :-

१) श्री.सं.ध.हेडाऊ, सहायक अभियंता श्रेणी-१ यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावर तदर्थ पदोन्नती दि.०७.०८.२०१२ च्या आदेशान्वये देण्यात आली असता, सदर आदेशाविरुध्द श्री.सोंडारे, उप विभागीय अभियंता यांनी अवमान याचिका क्र.२३८४५/२०१२ दाखल केलेली आहे. सदर अवमान याचिका मा.उच्च न्यायालयात प्रलंबित आहे.

२) कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या दिनांक २१.१२.१९७० ते ३१.०३.१९९३ या कालावधीच्या सेवाज्येष्ठता याद्या तयार करताना दिनांक ०७.०४.१९८३च्या ज्येष्ठता विनियमानातील तरतुदीनुसार विशेषत: सहायक कार्यकारी अभियंता व उप अभियंता यांची पदे भरताना ४०:६० या कोट्याचे पालन न झाल्याबाबत मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई मध्ये दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र. १०७/१९९९ व १४६/१९९९ मध्ये दिनांक २७.०४.२००० रोजी वरील परिच्छेद-७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे आदेश पारीत केले आहेत.

३) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या दिनांक २७.०४.२००० च्या आदेशाविरुध्द शासनाने मा.उच्च न्यायालय, मुंबई मध्ये दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र. १७९७/२००१ मध्ये दिनांक २७.०१.२००५ रोजीच्या आदेशान्वये, मा.न्यायाधिकरणाच्या दिनांक २७.०४.२००० रोजी आदेशित केलेली विहित ज्येष्ठता निश्चितीबाबतची मार्गदर्शक तत्वे, सदर आदेशातील परिच्छेद-२२ मधील अ.क्र. ३ वगळून ग्राह्य ठरविली आहेत.

४) कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गात सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गातील अधिकाऱ्यांना सेवाप्रवेश नियमानुसार त्यांना विहीत केलेल्या कोट्यानुसार कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावर अधिक प्रमाणात पदोन्नती दिल्याने, उप विभागीय अभियंता संवर्गातील श्री.ध.तु.शिंपणे यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज.९३८/२००९ प्रकरणी दिनांक ०७.०४.२०१० रोजी वरील परिच्छेद-२७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे निर्णय देऊन प्रकरण खारीज करण्यात आले आहे.

५) उपरोक्त मा.न्यायाधिकरणाने दिलेल्या आदेशाविरुध्द सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गातील श्री.ध.मा.गोडसे यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.३९७१/२०१० दाखल केली आहे. तसेच, शासनाच्या वतीने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्र.४२८४/२०१० दाखल करण्यात आली आहे. त्यापैकी श्री.गोडसे यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिकेमध्ये मा.न्यायालयाने दिनांक ३०.०४.२०१० रोजी परिच्छेद-२७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे निर्णय दिलेला आहे.

तर, शासनाने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.४२८४/२०१० मध्ये मा.न्यायालयाने दिनांक ०६.०५.२०१० रोजी पुढीलप्रमाणे निर्णय दिलेला आहे:-

“This petition to be heard along with Writ Petition No.३९७१ of २०१०. Interim relief as is passed in Writ Petition No.३९७१ of २०१० to operate in this petition also.”

६) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद यांच्या मूळ अर्ज क्र. ९३८/२००९ मधील दिनांक ०७.०४.२०१० रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने शासनाने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्र.४२८४/२०१० मध्ये सिव्हील ॲप्लीकेशन क्र. १२१२२/२०१७ दाखल केले होते. सदर प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दिनांक २६.०९.२०१७ रोजीच्या सुनावणीच्या वेळी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या दिनांक ०७.०४.२०१० च्या आदेशास स्थगिती देऊन, कार्यकारी अभियंता संवर्गातील सहायक कार्यकारी अभियंता संवर्गाच्या कोट्यातील रिक्त पदे सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार अर्हता प्राप्त करणाऱ्या निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांमधून भरण्यात यावीत, असे निर्देश देलेले आहेत.

मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद यांचे सदर दिनांक ०७.०४.२०१० चे आदेश व श्री.गोडसे यांनी दाखल केलेल्या रिट याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे दिनांक ३०.०४.२०१० चे आदेश विचारात घेता, सन २०१०-२०११, सन २०११-२०१२, सन २०१२-२०१३ व सन २०१३-२०१४ च्या निवडसूचीतून सहायक अभियंता श्रेणी-१ या संवर्गातील अधिकाऱ्यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावर पदोन्नत्या देण्यात आलेल्या नाहीत. तसेच, सन २०१४-२०१५, सन २०१५-२०१६ व सन २०१६-२०१७ च्या निवडसूच्यांमधून मा.न्यायाधिकरणाने व मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने पदोन्नत्या देण्यात आलेल्या आहेत. वरील दोन्ही याचिका अद्यापी न्यायप्रविष्ठ आहेत.

७) श्री.सु.ब. चव्हाण, कार्यकारी अभियंता यांच्यासह अन्य सहायक अभियंता श्रेणी-१ या निम्न संवर्गामधून तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई मध्ये मूळ अर्ज क्र. ७११/२०१४ दाखल केला असून प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

८) श्री.सं.दि. डोणगांवकर, कार्यकारी अभियंता यांच्यासह अन्य सहायक अभियंता श्रेणी-१ या निम्न संवर्गामधून तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई मध्ये मूळ अर्ज क्र. ११०१/२०१५ दाखल केला असून प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

९) श्री.र.दौ. वर्धने, कार्यकारी अभियंता यांच्यासह अन्य सहायक अभियंता श्रेणी-१ या निम्न संवर्गामधून तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई मध्ये मूळ अर्ज क्र. १०७८/२०१६ दाखल केला आहे. सदर प्रकरण अंतिम सुनावणीसाठी न्यायप्रविष्ठ आहे.

१०) तद्नंतर, मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल असलेल्या रिट याचिका क्रमांक- ४२८४/२०१० मध्ये सिव्हील ॲप्लीकेशन क्रमांक- १२१२२/२०१७ संदर्भात मा.उच्च न्यायालयाने दिनांक २६.९.२०१७ रोजी पारित केलेल्या आदेशाची अंमलबजावणी करण्याकरीता श्री.संग्रामसिंग दे. रावल व इतर यांनी शासनाच्या विरूध्द मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे अवमान याचिका क्रमांक- ३८७/२०२० दाखल केली. दरम्यान, सहायक कार्यकारी अभियंता संवर्गातील याचिकाकर्ता श्री.रावल व इतर अर्हताप्राप्त अधिकाऱ्यांना दिनांक २३.०९.२०२१ च्या आदेशान्वये पदोन्नती देण्यात आली असल्याने, मा.उच्च न्यायालयाने दिनांक १०.०१.२०२२ च्या आदेशान्वये प्रकरण खारीज केले आहे.

११) श्री.एस.पी. आडे, कार्यकारी अभियंता यांच्यासह अन्य सहायक अभियंता श्रेणी-१ या निम्न संवर्गामधून तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर मध्ये मूळ अर्ज क्र. १८७/२०२२ दाखल केला असून, प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

१२) श्री.विनायक बाबुराव जाधव, कार्यकारी अभियंता यांच्यासह अन्य सहायक अभियंता श्रेणी-१ या निम्न संवर्गामधून तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई मध्ये मूळ अर्ज क्र. ९३७/२०२२ दाखल केला असून, प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

१३) श्री.सलीम शेख, कार्यकारी अभियंता यांच्यासह अन्य सहायक अभियंता श्रेणी-१ या निम्न संवर्गामधून तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद मध्ये दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र. २१५/२०२२ मधील दिनांक १३.०२.२०२३ रोजीच्या आदेशाविरुध्द श्री.शेख यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र. २२६५/२०२३ दाखल केली असून, श्री.सुनील गोरुलाल राठी यांनी रिट याचिका क्र. २२५९/२०२३ दाखल केली आहे. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणामधील मूळ अर्ज दिनांक १३.०२.२०२३ च्या आदेशान्वये निकाली काढण्यात आलेला असून, मा.उच्च न्यायालयातील रिट याचिका न्यायप्रविष्ठ आहेत.

प्रस्तुत कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाची दिनांक ०१.०४.२००१ ते दिनांक ०१.०१.२०२० रोजीच्या ज्येष्ठता सूची वरील सर्व न्यायालयीन प्रकरणी अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे.

२९. सदर सुधारित तात्पुरत्या ज्येष्ठता सूचीमध्ये सरळसेवेने नियुक्त झालेल्या उमेदवारांबरोबरच तत्कालीन आरक्षण कायद्यानुसार तयार करण्यात आलेल्या निवडसूच्यांवर आधारित पदोन्नती दिलेल्या कर्मचाऱ्यांचा देखील समावेश करण्यात आलेला आहे. पदोन्नतीमधील आरक्षणाबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या याचिका क्रमांक- २७९७/२०१८ प्रकरणी दिनांक ०४.०८.२०१७ रोजीच्या निर्णयान्वये, दिनांक २५.०५.२००४ चा शासन निर्णय अवैध ठरविल्याने, मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक- २८३०६/२०१७ दाखल करण्यात आली आहे. मा.सर्वोच्च न्यायालयाने मा.उच्च न्यायालयाच्या आदेशास अद्याप स्थगिती दिलेली नसून, सदर याचिका अद्याप न्यायप्रविष्ठ आहे. सामान्य प्रशासन विभागाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक- २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून, दिनांक २९.१२.२०१७ च्या पत्रान्वये पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे सेवाज्येष्ठतेनुसार आणि दिनांक ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयान्वये पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दिनांक २५.०५.२००४ च्या सेवाज्येष्ठतेनुसार यथास्थिती मूळ सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात

भरण्याच्या सूचना दिल्या आहेत. तसेच, आरक्षणासंदर्भातील न्यायालयीन प्रकरणातील न्याय निर्णयानुसार भविष्यात निवडसूच्यांमध्ये बदल झाल्यास त्यानुसार पदोन्नत कर्मचाऱ्यांच्या ज्येष्ठतेमध्ये भविष्यात बदल होण्याची शक्यता आहे. यास्तव, मा.सर्वोच्च न्यायालयाचे अंतिम आदेश होईपर्यंत जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या ज्येष्ठता सूची अंतिम न करण्याचे अभिप्राय सामान्य प्रशासन विभागाने दिले आहेत. त्यास अनुसरुन सदर सुधारित तात्पुरती ज्येष्ठता सूची मा.सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक- २८३०६/२०१७ मधील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधिन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे.

३०. एकंदरित, जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या सेवाज्येष्ठतेबाबतचे वरील नमूद सर्व न्यायनिर्णय, मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक २७.०४.२००० नुसार ठरविलेली व मा.उच्च न्यायालयाने मान्य केलेली ज्येष्ठता निश्चितीबाबतची मार्गदर्शक तत्वे, ज्येष्ठतेसंदर्भात दिनांक ०७.०४.१९८३ अन्वये अधिसूचित करण्यात आलेले सुधारीत नियम, दिनांक १९.१२.१९७० च्या शासन निर्णयामधील ज्येष्ठता निश्चित करण्याबाबत विहीत केलेली तरतूद, सामान्य प्रशासन विभागाने पदोन्नतीबाबत वेळोवेळी निर्गमित केलेले नियम/ शासन निर्णय/ आदेश/ परिपत्रके इत्यादीच्या आधारे कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाची वर्षनिहाय मंजूर पदे, कार्यरत पदे, रिक्त पदे, सेवानिवृत्ती/ पदोन्नती/ स्वेच्छासेवानिवृत्ती/ राजीनामा/ निधन इत्यादी कारणांमुळे विहीत कोट्यानुसार निवडसूची वर्षनिहाय उपलब्ध झालेली रिक्त पदे विचारात घेऊन कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गाच्या दिनांक ०१.०४.२००१ ते ३१.०३.२०१९ या कालावधीच्या निवडसूचींचे पुनर्विलाकन करुन नियमित झालेल्या अभियंत्यांच्या दिनांक ०१.०४.२००१ ते दिनांक ०१.०१.२०२० या कालावधीच्या वर्षनिहाय सुधारित तात्पुरती ज्येष्ठतासूची सोबत जोडलेल्या **प्रपत्र-१ ते प्रपत्र-२०** मध्ये प्रसिध्द करण्यात येत आहे.

३१. सदर ज्येष्ठतासूचीमध्ये दिनांक ३१.०३.२०१९ पर्यंत नियमित झालेले अधिकारी वगळता तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेले अधिकाऱ्यांची नांवे ज्येष्ठता सूचीमध्ये अंतर्भूत करण्यात आलेली नाहीत. सदर अधिकाऱ्यांबाबत सन २०१९ नंतरच्या निवडसूचींचे पुनर्विलोकन व समायोजन करुन सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार त्या-त्या निम्न संवर्गाच्या कोट्यामध्ये नियमित पदोन्नतीसाठी पदे उपलब्ध झाल्यावर देय होणारा ज्येष्ठतेचा दिनांक दर्शवून ज्येष्ठता यादीमध्ये नांवे अंतर्भूत करण्यात येतील.

३२. जलसंपदा विभागांतर्गत सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांना सूचित करण्यात येत आहे की, आपल्या नियंत्रणाखालील सर्व कार्यकारी अभियंता (स्था.) यांना सदर ज्येष्ठता यादीची प्रत उपलब्ध करुन देण्यात यावी. सदर सेवाज्येष्ठता यादी संदर्भात काही वास्तविक चुका, त्रुटी असल्यास संबंधीत अधिकाऱ्यांनी त्यांचे अभिवेदन/ निवेदन **१५ दिवसांत** सादर करण्याबाबत संबंधितांस कळविण्यात यावे. सदर विहीत कालावधीनंतर प्राप्त झालेली अभिवेदने / निवेदने विचारात घेतली जाणार नाहीत, याची जाणीव संबंधितांस करुन देण्यात यावी.

३३. **सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या निदेशानुसार सदर सेवाज्येष्ठता याद्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने प्रसिध्द करण्यात येत आहे.**

३४. सदर शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०७३११९०८४६१०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. तसेच सदर परिपत्रक जलसंपदा विभागाच्या wrd.maharashtra.gov.in

या संकेतस्थळावरील पत्रपेटीत उपलब्ध करुन देण्यात येत आहे. संबंधितांनी सदर परिपत्रकाची प्रत वरील संकेतस्थळावरुन प्राप्त करुन घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDDHAV R DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE
DN: CN = UDDHAV R DAHIPHALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.08.01 11:47:40 +05'30'

**( उ. र. दहिफळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) प्रधान सचिव, मृद व जलसंधारण, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
९) सर्व महासंचालक / कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग,
१०) सर्व मुख्य अभियंते व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) सर्व प्रादेशिक मुख्य अभियंते, जलसंपदा विभाग,
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१३) सचिव, आंतर राज्य नियंत्रण मंडळ, नागपूर,
१४) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
१५) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
१६) सामान्य प्रशासन विभाग (का-१२), मंत्रालय, मुंबई.
१७) सर्व संबंधित अधिकारी
१८) कार्यासने : आ.(वर्ग-२) / आ. (सं.नि.) / आ.(प्रशि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९) कार्यासन आ (वर्ग-१) निवडनस्ती.

**परिशिष्ट-१**

**शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- एसएलएस २०२२/प्र.क्र. १४६/२०२२/आ(वर्ग-१), दिनांक ३१.०७.२०२३ सोबतचे सहपत्र.**

**जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गसंख्येचे दिनांक ०१.०४.२००० ते ०१.०९.२०२० पर्यंत निश्चित करण्यात आलेले विवरण**

| अ.क्र. | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | दिनांक | संवर्ग संख्या |
|---|---|---|---|
| १ | सीडीएस १११३/(१२२/२०१३)/आ(वर्ग-१), दिनांक ०३.०४.२०१३ | ०१.०४.२००० | ४७४ |
| २ | | ०१.०४.२००१ | ४२० |
| ३ | | ०१.०४.२००२ | ४०७ |
| ४ | | ०१.०४.२००३ | ४०७ |
| ५ | | ०१.०४.२००४ | ४२० |
| ६ | | ०१.०४.२००५ | ४१६ |
| ७ | | ०१.०४.२००६ | ४१६ |
| ८ | | ०१.०४.२००७ | ४१६ |
| ९ | | ०१.०४.२००८ | ४१६ |
| १० | | ०१.०४.२००९ | ४१६ |
| ११ | | ०१.०४.२०१० | ४२९ |
| १२ | | ०१.०४.२०११ | ४०७ |
| १३ | | ०१.०४.२०१२ | ४०७ |
| १४ | | ०१.०४.२०१३ | ४०६ |
| १५ | सीडीएस १११५/(४५/२०१५)/आ(वर्ग १), दिनांक ०९.०३.२०१५ | ०१.०४.२०१४ | ४०६ |
| १६ | सीडीएस १११६/(१६/२०१६)/आ(वर्ग १), दिनांक २०.०१.२०१६ | ०१.०४.२०१५ | ४०७ |
| १७ | संकीर्ण २०१७/(६६/२०१७)/आ(वर्ग १), दिनांक २२.०२.२०१७ | ०१.०१.२०१६ | ४०७ |
| १८ | संकीर्ण २०१७/(६६/२०१७)/आ(वर्ग १), दिनांक २२.०२.२०१७ | ०१.०१.२०१७ | ४०८ |
| १९ | संकीर्ण २०१९/प्र.क्र. २५५/२०१९/आ (वर्ग १), दिनांक ०६.०९.२०१७ | ०१.०९.२०१८ | ३४२ |
| २० | संकीर्ण २०१९/प्र.क्र. २५५/२०१९/आ (वर्ग १), दिनांक ०६.०९.२०१७ | ०१.०९.२०१९ | ३४२ |
| २१ | संकीर्ण २०२०/प्र.क्र. २१४/२०२०/आ (वर्ग १), दिनांक १६.०४.२०२० | ०१.०९.२०२० | ३४२ |

UDDHAV R DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE
DN: CN = UDDHAV R DAHIPHALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.08.01 11:48:00 +05'30'

परिशिष्ट-२

शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक- एसएलएस २०२२/प्र.क्र. १४६/२०२२/आ(वर्ग-१), दिनांक ३१.०७.२०२३ सोबतचे सहपत्र.

दिनांक ०१.०४.२००१ ते ३१.०३.२०१९ या कालावधीतील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील मंजूर पदे, सहायक कार्यकारी अभियंता व उप अभियंता (उप अभियंता, सहायक अभियंता श्रेणी-१, उप विभागीय अभियंता आणि उप विभागीय अधिकारी) संवर्गातील प्रत्यक्ष कार्यरत पदे, रिक्त पदे (प्रत्यक्ष रिक्त + संभाव्य रिक्त) व रिक्त पदांच्या प्रमाणानुसार नियमित पदोन्नतीसाठी उपलब्ध झालेली पदे आणि कार्यकारी अभियंता पदावर नियमित केलेली पदे याबाबतचा वर्षनिहाय व संवर्गनिहाय तपशील

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २००१-०२ | मंजूर पदे | १६८ | ० | १०५ | १०५ | ४२ | ४२० |
| | कार्यरत पदे | ७९ | ८ | ११६ | १२१ | २१ | ३४५ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ८९ | ०+३= ३ | -११+७= -४ (४ अधिकची पदे) | -१६+३९= २३ | २१+८= २९ | १४० |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ५६ | ० | ३५ | ३५ | १४ | १४० |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | १ | ५ | ० | १९ | १५ | ४० |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २००२-०३ | मंजूर पदे | १६२ | ० | १०२ | १०२ | ४१ | ४०७ |
| | कार्यरत पदे | ७९ | ५ | १०९ | १०० | २७ | ३२० |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ८३ | ०+३=३ | -७+४=-३ (३ अधिकची पदे) | २+३४=३६ | १४+१२=२६ | १४५ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ५८ | ० | ३६ | ३६ | १५ | १४५ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | २ | ० | २४ | ९ | ३५ |
| २००३-०४ | मंजूर पदे | १६२ | ० | १०२ | १०२ | ४१ | ४०७ |
| | कार्यरत पदे | ७९ | २ | १०५ | ९० | २४ | ३०० |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ८३ | ०+२=२ | -३+४=१ | १२+३७=४९ | १७+६=२३ | १५८ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ६३ | ० | ४० | ४० | १५ | १५८ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | १ | ० | १ | २८ | १० | ४० |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २००४-०५ | मंजूर पदे | १६८ | ० | १०५ | १०५ | ४२ | ४२० |
| | कार्यरत पदे | ६५ | ० | १०२ | ८१ | २८ | २७६ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | १०३ | ० | ३+१२= १५ | २४+४१= ६५ | १४+६= २० | २०३ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ८१ | -- | ५१ | ५१ | २० | २०३ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | १८ | -- | १४ | ४१ | ५ | ७८ |
| २००५-०६ | मंजूर पदे | १६६ | ० | १०४ | १०४ | ४२ | ४१६ |
| | कार्यरत पदे | ८० | ० | १०४ | ८१ | २७ | २९२ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ८६ | ० | ०+२१= २१ | २३+२५= ४८ | १५+२= १७ | १७२ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ६९ | -- | ४३ | ४३ | १७ | १७२ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ४ | ० | १९ | २१ | ९ | ५३ |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २००६-०७ | मंजूर पदे | १६६ | ० | १०४ | १०४ | ४२ | ४१६ |
| | कार्यरत पदे | ५८ | ० | १०२ | ७६ | ३४ | २७० |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | १०८ | ० | २+१५= १७ | २८+३४= ६२ | ८+१२= २० | २०७ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ८३ | -- | ५२ | ५२ | २० | २०७ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | ० | १५ | ४२ | १४ | ७१ |
| २००७-०८ | मंजूर पदे | १६६ | ० | १०४ | १०४ | ४२ | ४१६ |
| | कार्यरत पदे | ५४ | ० | १०२ | ८३ | ३६ | २७५ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ११२ | ० | २+९= ११ | २१+३९= ६० | ६+९= १५ | १९८ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ७९ | -- | ५० | ५० | १९ | १९८ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | -- | ७ | ४५ | १० | ६२ |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २००८-०९ | मंजूर पदे | १६६ | ० | १०४ | १०४ | ४२ | ४१६ |
| | कार्यरत पदे | ५० | ० | १०० | ८० | ३७ | २६७ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ११६ | ० | ४+१४= १८ | २४+३२= ५६ | ५+१०= १५ | २०५ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ८२ | -- | ५१ | ५१ | २१ | २०५ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | ० | १४ | ४८ | १२ | ७४ |
| २००९-१० | मंजूर पदे | १६६ | ० | १०४ | १०४ | ४२ | ४१६ |
| | कार्यरत पदे | ४७ | ० | १०० | ८५ | ३९ | २७१ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ११९ | ० | ४+४= ८ | १९+३९= ५८ | ३+५= ८ | १९३ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ७७ | -- | ४८ | ४८ | २० | १९३ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | ० | ५ | ५३ | ६ | ६४ |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २०१०-११ | मंजूर पदे | १७२ | ० | १०७ | १०७ | ४३ | ४२९ |
| | कार्यरत पदे | ४७ | ० | १०१ | ९२ | ४० | २८० |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | १२५ | ० | ६+७= १३ | १५+३८= ५३ | ३+६= ९ | २०० |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ८० | -- | ५० | ५० | २० | २०० |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | ० | ८ | ४९ | ८ | ६५ |
| २०११-१२ | मंजूर पदे | १६३ | ० | १०२ | १०२ | ४० | ४०७ |
| | कार्यरत पदे | ४६ | ० | १०१ | ९९ | ४२ | २८८ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ११७ | ० | १+८= ९ | ३+१८= २१ | -२+९= ७ | १५४ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ६२ | -- | ३९ | ३९ | १४ | १५४ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | १४ | ० | ३ | १७ | ४ | ३८ |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २०१२-१३ | मंजूर पदे | १६३ | ० | १०२ | १०२ | ४० | ४०७ |
| | कार्यरत पदे | ६० | ० | ९७ | ९८ | ३६ | २९१ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | १०३ | ० | ५+२३=२८ | ४+२१=२५ | ४+८=१२ | १६८ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ६७ | -- | ४२ | ४२ | १७ | १६८ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | ० | २२ | २१ | १२ | ५५ |
| २०१३-१४ | मंजूर पदे | १६२ | ० | १०२ | १०२ | ४० | ४०६ |
| | कार्यरत पदे | ५४ | ० | ९५ | ९८ | ४० | २८७ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | १२० | ० | ७+११=१८ | ४+१८=२२ | ०+११=११ | १७१ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ६८ | -- | ४३ | ४३ | १७ | १७१ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | ० | १३ | २० | ११ | ४४ |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २०१४-१५ | मंजूर पदे | १६३ | ० | १०२ | १०२ | ४० | ४०७ |
| | कार्यरत पदे | ६६ | ० | ९७ | १०० | ३९ | ३०२ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ९७+५= १०२ | ० | ५+२७= ३२ | २+१८= २० | २+१३= १५ | १६९ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ६८ | -- | ४२ | ४२ | १७ | १६९ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | २४ | ० | ३१ | १९ | १४ | ८८ |
| २०१५-१६ | मंजूर पदे | १६३ | ० | १०२ | १०२ | ४१ | ४०८ |
| | कार्यरत पदे | ६० | ० | १०१ | १०१ | ४० | ३०२ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | १०३+१५ = ११८ | ० | १+१९= २० | १+१४= १५ | १+५= ६ | १५९ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ६४ | -- | ४० | ४० | १५ | १५९ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | ० | १८ | १२ | ५ | ३५ |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २०१६-१७ | मंजूर पदे | १६३ | ० | १०२ | १०२ | ४० | ४०७ |
| | कार्यरत पदे | ४५ | ० | १०० | ९९ | ३८ | २८२ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ११८+४ = १२२ | ० | २+२०= २२ | ३+२५= २८ | २+२४= २६ | १९८ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ७९ | -- | ५० | ५० | १९ | १९८ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | २४ | ० | २१ | २३ | २३ | ९१ |
| २०१७-१८ | मंजूर पदे | १६३ | ० | १०२ | १०२ | ४० | ४०७ |
| | कार्यरत पदे | ६६ | ० | १०१ | ९७ | ३७ | ३०१ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ९७+२= ९९ | ० | १+२३= २४ | ५+२१= २६ | ३+१६= १९ | १६८ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ६७ | -- | ४२ | ४२ | १७ | १६८ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | ० | ० | १२ | १६ | ७ | ३५ |

| निवडसूची वर्ष | तपशिल | सकाअ | उप अभियंता (गोठीत संवर्ग) | सअ श्रेणी-१ | उप विभागीय अभियंता | उप विभागीय अधिकारी | एकूण कार्यकारी अभियंता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २०१८-१९ | मंजूर पदे | १३७ | ० | ८६ | ८६ | ३३ | ३४२ |
| | कार्यरत पदे | ८२ | ० | १०० | ९४ | २७ | ३०३ |
| | रिक्त पदे (प्रत्यक्ष+संभाव्य) | ५५+१४ = ६९ | ० | -१४+१३= -१ | -८+३३= २५ | ६+६= १२ | १०५ |
| | १९८३ च्या ज्येष्ठतेच्या नियमातील ४(२) नुसार रिक्त पदांच्या प्रमाणात उपलब्ध पदे | ४२ | -- | २७ | २७ | ९ | १०५ |
| | का.अ. पदावर नियमित करण्यासाठी उपलब्ध पात्र अधिकारी | १८ | ० | ० | १७ | ० | ३५ |

UDDHAV R DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE
DN: CN = UDDHAV R DAHIPHALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.08.01 11:48:37 +05'30'

